मागणी क्रमांक डब्ल्यु-३, २२०३ तंत्रशिक्षण, (२२०३ ०१४९) ३६ सहाय्यक अनुदाने (वेतन) (योजनेत्तर) या लेख्याशिर्षाखाली सन २०११-१२ या आर्थिक वर्षासाठी अर्थसंकल्पीत तरतूदीं आहरित करण्यांस मान्यता देणेबाबत.......

**महाराष्ट्र शासन**

उच्च व तंत्र शिक्षण विभाग

शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०११/(१५०/११)/व्यशि-२ (अर्थसं)

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

दिनांक :- २३ ऑगस्ट, २०११.

संदर्भ :- १) वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक अंदाज-२०.११/प्र.क्र.९३/२०११/अर्थसंकल्प-३, दिनांक ०६ मे, २०११.

२) प्र.संचालक (व्यवसाय शिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई - ०१ यांचे पत्र क्रमांक ५/अर्थस/२२०३/ २०११-१२/८५, दिनांक १२ जुलै, २०११.

**प्रस्तावना** :- राज्यात अशासकीय अनुदानित २२५ तंत्रशाळा ,+२ स्तरावरील व्यवसाय अभ्यासक्रम (द्विलक्षी) शिकविणाऱ्या १२९ संस्था, उच्च माध्यमिक व्यवसाय अभ्यासक्रम शिकविणाऱ्या ९२४ संस्था अशा एकूण व्यवसाय अभ्यासक्रम राबविणाऱ्या १२७८ अशासकीय अनुदानित संस्था कार्यरत आहेत. या संस्थांमध्ये शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांची संख्या ९५४३ इतकी आहे. या शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांच्या वेतनावरील खर्चासाठी सहाय्यक अनुदान देण्यांत येते.

सन २०११-१२ या वित्तीय वर्षामध्ये उपरोक्त खर्चासाठी मागणी क्रमांक डब्ल्यू-३, २२०३ तंत्र शिक्षण, १०४(०१)(०१) अशासकीय तंत्र महाविद्यालये व संस्थांना सहाय्य, तंत्र व औद्योगिक शाळा, (२२०३ ०१४९) (३६) सहाय्यक अनुदाने वेतन या लेखाशिर्षाखाली रूपये ३५५१६.८९ लक्ष इतकी तरतूद मार्च, २०११ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात थेट अर्थसंकल्पीत करण्यांत आलेली आहे. या तरतूदीपैकी वित्त विभागाच्या परिपत्रक दिनांक ०६ मे, २०११ अनुसार रूपये २६६३७.६६ लक्ष इतकी तरतूद अर्थसंकल्पीय अंदाज, वितरण व सनियंत्रण प्रणालीद्वारे कार्यान्वित यंत्रणेस वितरीत करण्यांत आलेली आहे. दिनांक ०६ मे, २०११ च्या वित्त विभागाच्या परिपत्रकानुसार (३६) वेतनाकरीता सहाय्यक अनुदाने या तपशिलवार लेखाशिर्षाखाली योजनेत्तर अर्थसंकल्पीय तरतूदीं कोषागारातून आहरित करण्यापूर्वी प्रशासकीय विभागाने वित्त विभागाच्या मान्यतेने शासन निर्णय निर्गमित करण्याचे निर्देश देण्यांत आलेले आहेत. तद्नुसार अर्थसंकल्पीय तरतूदीं कोषागारातून आहरित करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाचे विचाराधिन होती.

**शासन निर्णय** :- वित्त विभाग, परिपत्रक दिनांक ०६ मे, २०११ मधील परिच्छेद ५ मधील तक्त्यातील अनुक्रमांक ०८ मध्ये नमूद केलेल्या अटींनुसार मागणी क्रमांक डब्ल्यू-३, २२०३ तंत्र शिक्षण, १०४(०१)(०१) अशासकीय तंत्र महाविद्यालये व संस्थांना सहाय्य, तंत्र व औद्योगिक शाळा, (२२०३ ०१४९) (३६) सहाय्यक अनुदाने (वेतन) या लेखाशिर्षाखाली मार्च, २०११ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात थेट अर्थसंकल्पीत करण्यांत आलेल्या रूपये ३५५१६.८९ लक्ष इतकी तरतूदीपैकी अर्थसंकल्पीय अंदाज, वितरण व सनियंत्रण प्रणालीद्वारे प्रत्यक्षात वितरीत करण्यांत आलेली **रूपये २६६३७.६६ लक्ष** इतकी तरतूद अधिदान व लेखा कार्यालय/कोषागार कार्यालयातून आहरित करण्यांस या शासन निर्णयान्वये खालील अटीचे अधिन राहून मान्यता देण्यांत येत आहे.

१. यापूर्वी मंजूर करण्यांत आलेल्या सहाय्यक अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे प्राप्त करून घेण्यांत यावीत.

२. अर्थसंकल्पीय तरतूदींचे वितरण व प्रत्यक्ष खर्चाचा मासिक अहवाल पुढील महिन्याच्या पहिल्या आठवडयात नियमितपणे शासनास सादर करण्यांत यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या व्यय शाखेच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ४५३/११/व्यय५, दिनांक २९ जुलै, २०११ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यांत येत आहे.

हा शासन निर्णय शासनाच्या संकेत स्थळावर www.maharashtra.gov.in यावर उपलब्ध असून, त्या संगणकीय सांकेतांक क्रमांक २०११८२३१५२४४४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

(सं.अ.बागेश्वर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. प्र.संचालक (व्यवसाय शिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर. (संचालनालयामार्फत)
३. सर्व जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, जिल्हा व्यवसाय शिक्षण कार्यालये (संचालनालयामार्फत)
४. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
६. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, वांद्रे, मुंबई.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालये (आहरण व संवितरण अधिकाऱ्यामार्फत)
८. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. उच्च व तंत्र शिक्षण विभाग (साशि-१)
१०. निवड नस्ती (व्यशि-२)